**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,**
**नाथनगर, ( उ ), पैठण, जिल्हा - औरंगाबाद**
**सन २०२२-२०२३ (अनिवार्य)**
**३१ सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) ( दुसरा हप्ता )**
**३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) ( तिसरा हप्ता )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२१२/प्र.क्र.५९/२२/१२ अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. २२ फेब्रुवारी, २०२३

<u>वाचा</u> :
१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प ३, दि.४ एप्रिल, २०२२.
२. वित्त विभाग, प्रधान सचिव ( व्यय ) यांचे अर्धशासकीय पत्र, क्र. अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/ अर्थसंकल्प ३, दि.५ एप्रिल, २०२२.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२२/प्र.क्र.५९/२२/१२ अ,दि.१० मे,२०२२
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०२२/प्र.क्र.५९/२२/१२ अ, दि.२८ जून, २०२२
५. संचालक, मराठवाडा प्रशासकीय प्रशिक्षण प्रबोधिनी,पैठण औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०२२/मप्रविप्रप्र/लेखा अनुदान/कावि ८२, दि.०६.०२.२०२३.
६. वित्त विभाग, शासन निर्णय कमांक : मुंविनि-२०२२/प्रक्र.२७/२०२२/विनियम ३, दि.१२ जानेवारी , २०२३.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक अर्थसं २०२२/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प ३,दि.८ फेब्रुवारी, २०२३.

**शासन निर्णय :**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.१४.७० लाख व वेतने रु.१००.०० लाख अशी एकूण रु. ११४.७० लाख (अक्षरी रुपये एकशे चौदा लाख, सत्तर हजार फक्त) इतकी तरतूद संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये करण्यात आली आहे.

२. सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील अनिवार्य खर्चाच्या अधिकारी/ कर्मचारी यांचा वेतन खर्च भागविण्यासाठी ३६ सहायक अनुदान ( वेतने ) करिता, अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार रु.९०.०० लाख ( अक्षरी रुपये नव्वद लाख फक्त) इतका निधी व कार्यालयीन खर्चासाठी, ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) करिता रु. ६.१७ लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.७ च्या शासन परिपत्रकान्वये सहाय्यक अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरित करण्यासाठी उपलब्ध करुन दिले आहे.

त्यापैकी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी संदर्भाधीन क्र.१ शासन परिपत्रकानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीतून संदर्भाधीन क्र.३ च्या व संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये

रु.३९,००,०००/- (रुपये एकोणचाळीस लाख फक्त) इतका निधी ३६ सहाय्यक अनुदान (वेतने) (पहिला व दुसरा हप्ता) म्हणून संस्थेस वितरित केला आहे.

तसेच, संस्थेच्या कार्यालयीन खर्चाकरिता संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून रु.१,०२,०००/- ( रुपये एक लाख, दोन हजार फक्त ) इतके ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) ( पहिला हप्ता ) म्हणून संस्थेस वितरित केला आहे.

३. आता संस्थेने संदर्भाधीन क्र. ५ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार अधिकारी व कर्मचारी यांचे २ महिन्यांच्या वेतनावरील खर्चासाठी एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या व अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानाच्या मर्यादेत रु.६,१५,००० /- ( अक्षरी रुपये सहा लाख, पंधरा हजार फक्त ) इतके अनुदान ३६ सहाय्यक अनुदान ( वेतने ) अंतर्गत ( तिसरा हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे.

त्याचप्रमाणे,संस्थेच्या कार्यालयीन खर्चाकरिता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून रु.२,५०,०००/- ( रुपये दोन लाख, पन्नास हजार फक्त ) इतके ३१ सहायक अनुदान (वेतनेतर ) ( दुसरा हप्ता ) म्हणून संस्थेस मंजूर करण्यात येत आहे.

४. हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान ( अनिवार्य ) ( २०७० ०७४६ ) याखाली सन २०२२ -२०२३ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु.६ ,१५,००० /- ( अक्षरी रुपये सहा लाख, पंधरा हजार फक्त ) व "३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर )" याखाली रु.२,५०,०००/- ( अक्षरी रुपये दोन लाख, पन्नास हजार फक्त) याप्रमाणे भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०२२-२०२३ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

७. **संस्थेस आता वितरीत करण्यात येत असलेले ३६ सहायक अनुदान (वेतने) संदर्भाधीन क्र. ६ अन्वये बिनशर्त आहे**.

८. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९ सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्रक्र.४३/अर्थ-३ दि.४ एप्रिल, २०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे .सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ अन्वये नमूद अटींची प्रस्तुत प्रकरणी पूर्तता होत आहे.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग एक, अनु.क्र. २७, परिच्छेद क्र.१४९ नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१३०६३१६९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAUMUDI RAVINDRA MARGAJ

Digitally signed by KAUMUDI RAVINDRA MARGAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=86b41f0c8c4d9cee4d4b8d9e6a2f78b63ed85082bb42fbb618ff074d97dd8622,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=367FC9F5DAA15F4A0F19196A388639367A57BDA9ED0C495EA0C57DA461234AB8, cn=KAUMUDI RAVINDRA MARGAJ
Date: 2023.02.22 13:11:21 +05'30'

**( कौमुदी मरगज )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,

३) विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष कार्यकारी समिती, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद.

४) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद

५) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद

६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद

७) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.

८) वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई

९) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई

१०) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)